**मुंबई लगतच्या अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराज यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्याबाबत.**

Techno-Legal Consultant **यांचे शुल्क अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः स्मारक ३११६/प्र.क्र.३४९/२९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: १४ ऑगस्ट, २०१८

**वाचा :**

१) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.खाक्षेस-१०९५/प्र.क्र.२१६/रस्ते-८,दि.११.१२.१९९७

२) सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे पत्र क्र.बीडीजी २०१६/प्र.क्र.२९५/इमा-३, दि.०१.१०.२०१६

३) अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, चेंबुर यांचे पत्र क्र.मुंबांमं/प्रशा/छ.शि.म. स्मा./४०७६, दि.२८.१२.२०१६

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

**प्रस्तावना :**

मुंबई लगतच्या अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराजांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक हा प्रकल्प अनोखा व वैशिष्ट्यपूर्ण असून अशा प्रकारचे काम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत नजीकच्या काळात झालेली नाही. परिणामी या कामासाठी शासनाने नियुक्त केलेल्या प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराकडून प्राप्त होणारे संकल्पन अहवाल, निविदाचे प्रारुप, निविदा मुल्यांकन, करारनामा इत्यादीची तांत्रिक व कायदेशीर तपासणी करुन त्याआधारे शासन स्तरावरील अमंलजबावणी, समन्वय व देखरेख समिती आणि उच्चाधिकार सुकाणू समितीस मान्यतेसाठी शिफारस करण्यासाठी तांत्रिक समितीस अनुभवी Tecno Legal Consultant ची आवश्यकता लागणार होती. त्याअनुषंगाने श्री.बी. जे. वसवदा (निवृत्त मुख्य अभियंता) यांचेकडे अशा कामाचा अनुभव असल्याने संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयानुसार त्यांची Tecno Legal Consultant म्हणून संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. त्यानुसार त्यांनी केलेल्या कामाबाबत श्री. बी. जे. वसवदा यांना रु.१४.५० लाख (अक्षरी रुपये चौदा लाख पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम देय होत आहे. सदर रक्कम उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

अरबी समुद्रातील छत्रपती शिवाजी महाराजांच्या स्मारकासाठी नियुक्त केलेल्या Tecno Legal Consultant श्री.बी. जे. वसवदा (निवृत्त मुख्य अभियंता) यांनी केलेल्या कामाचे शुल्क रु.१४.५० लाख (अक्षरी रुपये चौदा लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी अदा करण्यासाठी कार्यकारी अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज प्रकल्प विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, बी.बी.आर.एस.कं.५, भूखंड क्र.१२०, झूलेलाल मंदिराशेजारी, कफ परेड, कुलाबा, मुंबई यांचेकडे सदर रक्कम वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची तरतूद आहरित करण्यासाठी उप अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज स्मारक प्रकल्प विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग,कुलाबा,मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर, मुंबई यांना नियंत्रकीय अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबत तसेच महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी. सदर निधी प्रत्यक्षात वितरीत झाल्यानंतर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल यांना पाठवून त्याची प्रत शासनास सादर करण्याची जबाबदारी अधिक्षक अभियंता, मुंबई (सां.बा.), मंडळ, मुंबई यांची राहील.

३. या कामावर होणारा खर्च मागणी क्रमांक ए-९, लेखाशीर्ष ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१, कार्यालयीन इमारत ०५१ बांधकामे, राज्य योजनातंर्गत योजना (००)(०१) अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराजांचे स्मारक उभारणे(४०५९ २५२१) ५३, मोठी बांधकामे या लेखाशीर्षा खाली सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच सदर लेखाशीर्षांतर्गत चालू वित्तीय वर्षासाठी (सन २०१८-१९) रु.३०० कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. सदर उपलब्ध निधीमधून Tecno Legal Consultant श्री.बी. जे. वसवदा (निवृत्त मुख्य अभियंता) यांनी केलेल्या कामाचे शुल्क रु.१४.५० लाख (अक्षरी रुपये चौदा लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग पाच मधील अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अनुसार व वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८मधील परिच्छेद क्र.६ (अ)(ब)(क) व परिच्छेद क्र. ७ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रमाणित करण्यात येते की, सदर शासन निर्णयातील निधी वितरीत करतांना वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८मधील परिच्छेद क्र. ६ (अ), (ब), (क) व परिच्छेद क्र.७, परिच्छेद क्र.८ व परिच्छेद क्र.९ येथे नमूद अटींची पूर्तता होते. तसेच वित्त विभागाच्या सदर परिपत्रकासोबत असलेल्या परिशिष्ट मधील अ.क्र. ८ येथे नमूद तपासणी सूचीचा अवलंब करण्यात आलेला आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१४१६०३५६६४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chhaya Kiran Wadte

Digitally signed by Chhaya Kiran Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f311bd8712a7b94b3b73d0e88ad01cf3a49c098bcd5f62e16e7135388baa523c, serialNumber=5bac345149360802f8cd3e4ab4ec174f2fec1bff420e81931e638ee6cdfcc12d, cn=Chhaya Kiran Wadte
Date: 2018.08.14 16:08:17 +05'30'

**( छा. कि. वडते )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२.मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई,
३.अपर मुख्य सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
४. प्रधान सचिव (र.व का.),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
५.सचिव (बांधकामे),सार्वजनिकबांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
६.मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प सार्वजनिक बांधकाम विभाग,२५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ०७१,
७.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
८. महालेखापाल-१(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
११.अधिक्षक अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज प्रकल्प विभाग, मुंबई बांधकाम मंडळ, प्रशासकीय इमारत, २रा मजला, रामचंद्र चेंबूरकर मार्ग, चेंबूर, मुंबई-४०० ०७१,
१२.कार्यकारी अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज प्रकल्प विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, बी.बी.आर.एस.कं.५, भूखंड क्र.१२०,झूलेलाल मंदिराशेजारी, कफ परेड, कुलाबा, मुंबई
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५.अवर सचिव (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४ ), मंत्रालय, मुंबई
१७.सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-२५ ), मंत्रालय, मुंबई
१८.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४४३),मंत्रालय,मुंबई,
१९.निवड नस्ती ( कार्यासन-२९) सा.प्र.विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.